तालुका/जिल्हा/राज्यस्तरीय
<u>समित्या बरखास्त करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्र. इएसई-२००२/प्र.क्र.१००/रोस्वरो-१
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ फेब्रुवारी, २००५.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र. इएसई-१०९७/ प्र क्र ३९६/रोस्वरो-२, दिनांक २६ सप्टेंबर, १९९७.
२) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र. इएसई-२०००/ प्र.क्र.२१२/रोस्वरो-१, दिनांक २३ ऑक्टोबर, २००१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील वाढत्या बेरोजगारीचा प्रश्न प्रभावीपणे हाताळण्यासाठी शासनाने रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीचा कालबध्द कार्यक्रम १९९७ मध्ये आखला होता. सदर कालबध्द कार्यक्रमांतर्गत शासनाच्या विविध विभागांच्या स्वयंरोजगार योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. (१) मधील शासन निर्णयान्वये पालकमंत्र्यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार समन्वय समिती स्थापन करण्यात आली होती. रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीच्या कालबध्द कार्यक्रमाची मुदत संपल्यानंतर शासनाने ऑक्टोबर २००० मध्ये नवीन धोरण आखले आहे. सदर धोरणानुसार रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीसाठी शासनाच्या विविध योजनांतर्गत लाभार्थ्यांची योग्य प्रकारे निवड व योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. (२) अन्वये उप विभागीय स्तरावर व जिल्हा स्तरावर रोजगार व स्वयंरोजगार समित्या स्थापन करण्यात आल्या होत्या. या समित्या बरखास्त करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यावर सर्वकष विचारांती शासन पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासनाने रोजगार व स्वयंरोजगाराच्या कालबध्द कार्यक्रमांतर्गत तसेच नवीन धोरणांतर्गत निर्माण केलेल्या खालील समित्या या शासन निर्णयान्वये बरखास्त करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | समिती | शासन निर्णय |
|---|---|---|
| १ | रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीच्या विशेष कार्यक्रमांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी मा. पालकमंत्र्यांचे अध्यक्षतेखालील "जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार समन्वय समिती". | शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र.इएसई-१०९७/प्र.क्र.३९६/रोस्वरो-२, दिनांक २६ सप्टेंबर, १९९७. |
| २ | उप जिल्हाधिकारी/प्रांत अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील "रोजगार व स्वयंरोजगार उप विभागीय समिती" | शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र. इएसई-२०००/प्र.क्र.२१२/ रोस्वरो-१, दिनांक २३ ऑक्टोबर, २००१. |
| ३ | मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील "रोजगार व स्वयंरोजगार जिल्हास्तरीय समिती". | शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र.इएसई-२०००/प्र.क्र.२१२/ रोस्वरो-१, दिनांक २३ ऑक्टोबर, २००१. |

वरील समित्या या शासन निर्णयाच्या दिनांकापासून बरखास्त करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ना.ल.तडोसे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
सर्व मंत्रालयीन विभागांचे अ.मु.स./प्र.स./सचिव,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, शासकीय/निमशासकीय संस्था/मंडळे/महामंडळे विद्यापीठे/शैक्षणिक प्रशिक्षण संस्था इत्यादी (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय आणि त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये,
व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई.
रोजगार व स्वयंरोजगार विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-१/आस्थापना.